बालसंगीतबोध—पुस्तक पहिलें—छापून तयार.

बालसंगीतबोध—पुस्तक दुसरें—छापत आहे.

बालसंगीतबोध—पुस्तक तिसरें—छापत आहे.

---

संगीतबोध—पुस्तक पहिलें—छापत आहे.

---

हीं पुस्तकें ट्रेनिंग कॉलेजचे क्लार्क, व सेक्रेटरी—गायनसमाज, यांजकडे विकत मिळतील.

पुणें गायनसमाज.

# बालसंगीतबोध.



## पुस्तक पहिलें.



हें

मुंबई इलाख्याचे विद्याधिकारी यांच्या सूचनेप्रमाणें

रा० रा० नारायण दासो बनहट्टी, बी. ए.,

ह्यांनीं तयार केलें.

---

आवृत्ति पहिली.

---



---

सन १९०४.

---

किंमत ६ आणे.

# प्रस्तावना.

---

मुंबई इलाख्याचे सार्वजनिक विद्याखात्याचे मुख्य अधिकारी यांच्या आज्ञेनें व पुणें येथील ट्रेनिंग कालेजचे प्रिन्सिपाल यांच्या अनुमतीनें येथील गायनसमाजाच्या तर्फेनें चाललेले गायनाचे वर्ग ट्रेनिंग कालेजास जोडल्यामुळें संगीत शास्त्राच्या व कलेच्या शिक्षणास अलीकडे थोडेंसें व्यवस्थित स्वरूप आलें आहे. तथापि परंपरेनें चालत आलेली शिक्षणपद्धति जोंपर्यंत सुरू आहे तोंपर्यंत विद्येच्या इतर शाखांमधील शिक्षणपद्धतींत ज्या तत्त्वांमुळें उत्क्रांति व सुधारणा झाली आहे त्या तत्त्वांचा नीटसा विचार करून त्यांचा स्वीकार न केल्यामुळें गायनविद्येचें पाऊल पुढें पडेनासें दिसून आल्यावरून गायनसमाजाच्या चालकांनीं अलीकडील सुधारलेल्या तत्त्वांच्या मार्गानें शिक्षण देण्याचा उपक्रम करून त्याकरितां शास्त्र व कला ह्या दोहींचेंही ज्ञान एकसमयावच्छेदें-करून व्हावें ह्या हेतूनें कांहीं पद्धतशीर क्रमिक पुस्तकेंही तयार करण्याचें त्यांनीं मनांत आणिलें. त्याप्रमाणें गेल्या सालीं प्रचारांत असलेल्या बऱ्याचशा अलंकाराच्या स्वरावर्ती व कांहीं पदें, ध्रुवपदें, ख्याल, रागाच्या स्वरावर्ती वगैरे परंपरेनें आलेलीं कवनें घेऊन त्यांस स्वर व ताल लावून तयार केलेलें पुस्तक प्रथम शिकविण्याची सुरवातही केली. पण प्रथमतः एकसारख्या दिसणाऱ्या पुष्कळशा स्वरावर्ती शिकण्याचा अनभिज्ञ मुलांस कंटाळा येतो, व ध्रुवपदें, ख्याल वगैरे उंच दरजाचें थोडेंसें गाणें आलें तरी विद्याखात्यांतील क्रमिक पुस्तकांत असलेल्या वृत्तात्मक कविता मुलांस तालसुरांत ह्मणतां येत नाहींत, व त्या कविता तर मुख्यत्वेंकरून पद्धतशीर गातां आल्या पाहिजेत, असा ट्रेनिंग कालेजचे प्रिन्सिपाल ह्यांचा व विद्याखात्यांतील इतर मान्य गृहस्थांचा अभिप्राय पडल्यामुळें स्वरांचें ज्ञान होण्याकरितां अगदीं निवडक व अतिशय उपयुक्त अशा अलंकाराच्या स्वरावर्ती, मराठी साही क्रमिक पुस्तकांतील व्यापक व नमुनेवाईक सर्व कविता व त्या पुस्तकांत नसलेल्या परंतु विशेष उपयुक्त अशा इतर नमुन्याच्या कविताही घेऊन त्या सर्व तालसुरांत बसवून तीन क्रमिक पुस्तकें तयार केलीं आहेत, त्यांस बालसंगीतबोध असें नांव दिलें आहे.

बालसंगीतबोधाच्या प्रत्येक पुस्तकांत प्रथम थोड्याशा सोप्या पण अत्युपयुक्त अशा स्वरावर्ती देऊन पुढें मराठी क्रमिक पुस्तकांतील कविता तालसुरांत बसवून लिहिल्या आहेत. ह्या कविता रागांत व तालांत बसवितांना कवितेचा प्रतिपाद्य विषय, प्रसंग, रस व काळ हे लक्षांत घेऊन होतां होईल तों सर्वप्रकारें अनुकूल असा राग व ताल बसविण्याचा प्रयत्न केला आहे. रागाचा अंशस्वर, अवसान, तालाची सम, व कवितेंतील मुख्य पदें ह्यांचा चोहोंकडे उत्तम मेळ पडावा ह्याबद्दल विशेष खबरदारी घेतली आहे. व ह्याच करितां कवितेंतील रस व प्रसंग बदलल्यास त्या त्या प्रसंगीं अनुकूल होतील अशा निरनिराळ्या रागांत व तालांत एकच कविता बसविणें भाग प-

डलें आहे. वृत्तात्मक कविता गायनाच्या दृष्टीनें रचलेल्या नसल्यामुळें अशा प्रकारचा सर्वांशीं मेळ बसविण्यास किती प्रयास पडतात हें तज्ज्ञ लोकांसच कळून येणार आहे. ह्या पुस्तकांत अशा प्रकारचा मेळ कितपत साधला आहे हें पाहणें गायनशास्त्रज्ञ व कलानिपुण मार्मिक पंडितांकडे आहे.

बालसंगीतबोधाच्या पहिल्या पुस्तकांत पहिल्या दोन पाठांत त्रिपुटतालांत तिन्ही लयांत तीन मूर्छना देऊन पुढें सात सोपे पण फार उपयोगी अलंकार दिले आहेत. नंतर मराठी पहिल्या व दुसऱ्या पुस्तकांतील नमुनेवाईक व निवडक सर्व कवितांस योग्य असे राग व ताल लावून पहिल्या ओळींत मोठ्या अक्षरांनीं स्वर, व दुसऱ्या ओळींत साहित्य ह्मणजे कवितेचे शब्द लिहिले आहेत. अशा प्रकारच्या पुस्तकांत गायनाचें अंग प्रधान असल्यामुळें रागाचे स्वर मुद्दाम मोठ्या अक्षरांनीं दाखविले आहेत, हें मार्मिक पंडितांच्या सहज लक्षांत येईल. कवितेच्या उत्तरार्धांत पूर्वार्धाचेच स्वर येत असल्यास कवितेच्या अक्षरांवर स्वर न घालितां कविता स्वररचनेस अनुकूल अशी लिहून खालीं फक्त ताल दिले आहेत.

ह्या पुस्तकांतील विषय, रचना व योजना ह्यांविषयीं मार्मिक पंडितांकडून सूचना आल्यास त्यांचा द्वितीय आवृत्तींत योग्य विचार केला जाईल.

हें पुस्तक तयार करितांना स्वर वगैरे लावण्याच्या कामांत गायनसमाजाचे शिक्षक रा० बाळकृष्ण नारायण नाटेकर यांची फार मदत झाली आहे.

पुणें, ता० १ मार्च,
सन १९०४.

ना० दा० बनहट्टी.

---



# अनुक्रमणिका.

---

## सांकेतिक चिह्नें.

—:※:—

| | | |
|---|---|---|
| ‿ | = | कोमल स्वर. जसें–म् = कोमल मध्यम. तीव्र व शुद्ध स्वरांस कांहीं चिह्न नाहीं. |
| ।̣ | = | मंद्रस्वर. जसें–ग॒ = मंद्रसप्तकांतील गांधार. |
| ! | = | तारस्वर. जसें– पं = तारसप्तकांतील पंचम. |
| – | = | साधारण ताल. |
| = | = | समेचा ताल. |
| ≠ | = | मुख्य समेचा ताल. |
| ० | = | स्वराच्या किंवा अक्षराच्या खालीं दिलेलें पोकळ शून्य ह्मणजे कालाची खूण होय. |
| ० | = | अक्षराच्या पुढें आलेलें पोकळ शून्य गणांतांचें ह्मणजे त्याच अक्षराचा स्वर लांबविण्याचें चिह्न होय. |
| S | = | एक मात्रेची खूण. |
| ⌒ | = | दोन किंवा अधिक स्वर एक मात्रेच्या कालांत ह्मणण्याची खूण. |
| आ. | = | आरोह. |
| अ. / अव. | = | अवरोह. |
| शु. | = | शुद्ध. |
| को. | = | कोमल. |
| ती. | = | तीव्र. |
| ध्रु. | = | ध्रुवपद ह्मणजे कडव्याच्या शेवटीं वारंवार उच्चारण्याचा पद्याचा प्रारंभाचा भाग. |

---

॥ श्रीः ॥

# बालसंगीतबोध.

## उपोद्धात.

### संगीत.

१. गायन वादन व नर्तन ह्मणजे गाणें वजावणें व नाचणें ह्या तिहींस मिळून **संगीत** असें ह्मणतात.

२. संगीत दोन प्रकारचें आहेः—१. **मार्ग** व २. **देशी.**

३. ब्रह्मदेवानें सामादि चारी वेदांपासून सप्तस्वर घेऊन जें संगीत शोधून काढिलें व जें देव व गंधर्व ह्यांना फार प्रिय तें मार्गसंगीत होय.

४. प्रत्येक देशांत लोकांनीं आपआपल्या आवडीप्रमाणें मनरंजन करणारें असें नवीन संगीत तयार केलें त्यास देशीसंगीत असें ह्मणतात.

५. संगीतशास्त्राचे मुख्य तीन विभाग आहेतः—१. **गायनविचार**, २. **वादनविचार**, व ३. **नर्तनविचार.**

६. गायनविचारांत नाद, श्रुति, स्वर, ग्राम, मूर्छना, तान, अलंकार, गमक, राग व ताल इत्यादि विषयांचा समावेश होतो.

७. वादनविचारांत, सतार, बीन, रुद्रवीणा, सारंगी वगैरे तारा लावून केलेलीं वाद्यें; मृदंग, तबला, ढोल, नगारा वगैरे चामडें मढवून तयार केलेलीं वाद्यें; पोंवा, अलगुज, मुरली, सन्हई वगैरे वारा घालून वाजणारीं वाद्यें; व टाळ, झांज, घंटा, घुंगुर वगैरे एकमेकांवर आपटून किंवा ठोका मारून वाजणारीं कठिण वाद्यें, ह्या सर्व वाद्यांचा व त्यांतून निघणारे बोल व गति ह्यांचा विचार केला असतो.

८. नर्तनविचारांत, नाट्य व नृत्य, डोळे, हात, पाय, अंग ह्यांचें चलनवलन व गति, हावभाव, अभिनय व रस, नायक व नायिका यांचे भेद वगैरे विषय येतात.

## गायनविचार.

### नाद.

९. गायनविचारांत नाद हा मुख्य आहे. नाद हा एक प्रकारचा शब्द किंवा

ध्वनि आहे. आपल्यास शब्द करण्याची इच्छा झाली ह्मणजे तो मनास प्रेरणा करितो, मन शरीरांतील अग्नीस आघात करितें, तो वायूस चालन देतो, नंतर ब्रह्मग्रंथींत असलेला वायु वर संचार करीत असतां क्रमानें हृदय, कंठ व मस्तक ह्या तीन ठिकाणीं ध्वनि उत्पन्न करितो, त्यास **नाद** असें म्हणतात.

१०. नाद तीन प्रकारचा आहे.—मंद्र, मध्य, व तार. हृदयांत व्यक्त होणाऱ्या नादास **मंद्र**, कंठांत होणाऱ्या नादास **मध्य**, व मस्तकांत होणाऱ्या नादास **तार** असें ह्मणतात.

## श्रुति.

११. प्रत्येक स्थानाचे ठिकाणीं वायु नाड्यांतून जातांना आघात होण्याबरोबर जो ध्वनि ऐकावयास येतो त्यास **श्रुति** असें म्हणतात. श्रुति २२ आहेत, व त्यांच्या ५ जाति आहेत.

## स्वर.

१२. आघात झाल्यानंतर तोच ध्वनि कांहीं वेळ पुढें घुमल्यासारखा होतो. हा अनुरणनात्मक ध्वनि स्वतः मनरंजन करणारा असतो व फार गोड लागतो म्हणून ह्यास **स्वर** अशी संज्ञा आहे.

१३. बावीस श्रुतींपासून मधुर असे सात स्वर निष्पन्न होतात. १. **षड्ज**, २. **ऋषभ**, ३. **गांधार**, ४. **मध्यम**, ५. **पंचम**, ६. **धैवत** व ७. **निषाद**. ह्या सात स्वरांस क्रमानें **स, रि, ग, म, प, ध, नि**, अशा लघु संज्ञा आहेत.

१४. षडज, मध्यम व पंचम हे चार चार श्रुतींचे आहेत, ऋषभ व धैवत हे तीन तीन श्रुतींचे आहेत, व गांधार व निषाद हे दोन दोन श्रुतींचे आहेत.

१५. ह्या सात स्वरांस **स्वरसप्तक** असें म्हणतात. हृदयांत व्यक्त होणाऱ्या सप्तकास **मंद्रसप्तक**, कंठांतील सप्तकास **मध्यसप्तक** व मस्तकांतील सप्तकास **तारसप्तक** असें म्हणतात.

१६. मध्यसप्तकांतील स्वरांस कांहीं खूण योजिली नाहीं. मंद्रसप्तकांतील स्वरांस खालीं लहानशी उभी रेघ व तारसप्तकांतील स्वरांस डोक्यावर लहानशी उभी रेघ दिली आहे. जसें:—

स, रि, ग, म, इ०—हे मंद्र सप्तकांतील स्वर होत.
। । । ।

स, रि, ग, म, इ०—हे मध्य ,, ,, ,,

सं, रिं, गं, मं इ०—हे तार ,, ,, ,,

## शुद्ध व विकृत स्वर.

१७. आपआपल्या पूर्ण श्रुतींवर अभिव्यक्त होणाऱ्या स्वरास **शुद्ध स्वर** असें म्हणतात.

८. आपआपली श्रुति सोडून पुढच्या किंवा मागच्या श्रुतीवर अभिव्यक्त होणाऱ्या स्वरास **विकृत स्वर** असें म्हणतात. विकृत स्वराचे दोन भेद आहेत:—१. तीव्र व २. कोमल.

१९. आपल्या ठरलेल्या श्रुतींपेक्षां जास्त श्रुति घेऊन निष्पन्न होणाऱ्या स्वरास **तीव्र** स्वर असें म्हणतात् व कमी श्रुतीच्या स्वरास **कोमल** स्वर असें म्हणतात.

२०. षड्ज व पंचम हे स्वर प्रचारांत शुद्ध आहेत, व बाकीच्या ५ स्वरांस तीव्र व कोमल हे भेद लावून १० स्वर होतात. शुद्ध व विकृत स्वर मिळून सध्यां प्रचारांत स्थूल मानानें १२ स्वरांवर निर्वाह केलेला आढळतो. शुद्ध व तीव्र स्वरांस कांहीं खूण योजिली नाहीं. कोमल स्वरांस व्यंजनाची खूण ह्मणजे पाय मोडल्याची खूण केली आहे.

१ षड्ज ( स ) शुद्ध .... ....स.
२ ऋषभ ( रि ) कोमल व तीव्र. ....रि्, रि.
२ गांधार ( ग ) कोमल व तीव्र. ....ग्, ग.
२ मध्यम ( म ) कोमल व तीव्र. ....म्, म.
१ पंचम ( प ) शुद्ध .... ....प.
२ धैवत ( ध ) कोमल व तीव्र. ध्, ध.
२ निषाद ( नि ) कोमल व तीव्र. नि्, नि.
—
१२ हे प्रचारांतील बारा स्वर होत.

२१. ह्या बारा स्वरांचा श्रुतिनिश्चय खालील कोष्टकांत केला आहे:-

| श्रुति | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | १ | २ | ३ | ४ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्वर | | | | स शु. | | रि् को. | | रि ती. | को. | | ग ता. (अंतर) | | का. | | म ती. | | प शु. | | ध् को. | | ध ती. | नि् को. | | नि ती. (काकली) | | स शु. |

२२. हे सात स्वर क्रमानें मोर ( स ), चातक ( रि ), मेंढा ( ग ), क्रौंच ( म ), कोकिळ ( प ), घोडा किंवा बेडूक ( ध ), व हत्ती ( नि ) ह्या पशुपक्ष्यांच्या शब्दांवरून घेतले आहेत.

२३. षड्ज व ऋषभ हे स्वर वीर, रौद्र व अद्भुत रसांस अनुकूल आहेत.
ध्यमम व पंचम हे स्वर शृंगार व हास्य रसांस अनुकूल आहेत.
गांधार व निषाद हे स्वर करुण रसास अनुकूल आहेत.
धैवत हा स्वर बीभत्स व भयानक रसांस अनुकूल आहे.

२४. **वादी, संवादी, विवादी** व **अनुवादी** असे चार प्रकारचे स्वर आहेत. ह्यांस क्रमानें **राजा, अमात्य** ( प्रधान ), **शत्रु** व **सेवक** असेंही म्हणतात.

२५. प्रयोगांत जो स्वर वारंवार उच्चारला जातो तो **वादी** किंवा **राजा** होय.

२६. ज्या दोन स्वरांमधील अंतर ८ किंवा १२ श्रुतींचें असतें ते एकमेकांचे संवादी होत. जसें—स, म, प; रि आणि ध; व ग आणि नि हे एकमेकांचे **संवादी** किंवा **प्रधान** होत.

२७. निषाद व गांधार हे स्वर ऋषभ व धैवत ह्यांचे परस्पर **विवादी** ह्मणजे **शत्रु** होत. लागोपाठ दोन श्रुतींवर अभिव्यक्त होणारे स्वरही एकमेकांचे **विवादी** ह्मणजे **शत्रु** मानिले आहेत.

२८. इतर स्वर एकमेकांचे **अनुवादी** ह्मणजे **सेवक** होत.

## ग्राम.

२९. मनुष्यांच्या समुदायास **ग्राम** म्हणतात, त्याचप्रमाणें स्वरसमुदायास संगीतशास्त्रांत **ग्राम** अशी संज्ञा आहे.

३०. ग्राम तीन आहेत:—षड्जग्राम, मध्यमग्राम व गांधारग्राम. ह्यांपैकीं गांधारग्राम देवलोकांत प्रसिद्ध आहे. षड्जग्राम व मध्यमग्राम हे दोन भूलोकीं आहेत, परंतु षड्जग्रामच प्रचारांत दृष्टोत्पत्तीस येतो. षड्जग्राम सर्व ग्रामांत मुख्य आहे.

३१. शास्त्रांत दिलेल्या श्रुतींवर अभिव्यक्त होऊन तयार झालेल्या सात स्वरांच्या समुदायास षड्जग्राम असें ह्मणतात. शुद्ध स्वरांप्रमाणें विकृत स्वरांच्या समूहास किंवा शुद्ध व विकृत ह्यांच्या मिश्रणानें झालेल्या स्वरसमुदायासही षड्जग्राम ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

## आरोह व अवरोह.

३२. षड्जापासून वरच्या निषादापर्यंत स्वर उच्चारतांना वर चढवीत जाणें ह्या क्रियेस **आरोह** ह्मणतात.

३३. तसेंच निषादापासून खालच्या षड्जापर्यंत स्वर उतरवीत येणें ह्या क्रियेस **अवरोह** ह्मणतात.

## मूर्छना.

३४. क्रमानें सातही स्वर एकवार चढवून पुन: खालीं उतरविणें ह्या कृत्यास **मूर्छना** असें ह्मणतात.

३५. प्रत्येक ग्रामांत सात सात मूर्छना होतात. तिन्ही ग्रामांच्या मिळून २१

मूर्छना आहेत. पैकीं षड्जग्राम व मध्यमग्राम ह्या दोने ग्रामांच्या १४ मूर्छना प्रसिद्ध आहेत. ह्या १४ मूर्छना, शुद्ध व विकृत स्वरांच्या योगानें ४ प्रकारच्या संभवतात. त्या सर्व मिळून एकंदर ५६ मूर्छना होतात.

३६. षड्जग्रामाच्या सात मूर्छना प्रचारांत प्रसिद्ध आहेत. त्यांचीं नांवें व रचना खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

**उत्तरमंद्रा**——(आ.) स रि ग म प ध नि (अव.) नि ध प म ग रि स

**रजनी**———(आ.) नि स रि ग म प ध (अव.) ध प म ग रि स नि

**उत्तरायता**——(आ.) ध नि स रि ग म प (अव.) प म ग रि स नि ध

**शुद्धषड्जा**——(आ.) प ध नि स रि ग म (अव.) म ग रि स नि ध प

**मत्सरीकृता**——(आ.) म प ध नि स रि ग (अव.) ग रि स नि ध प म

**अश्वक्रांता**——(आ.) ग म प ध नि स रि (अव.) रि स नि ध प म ग

**अभिरुद्गता**——(आ.) रि ग म प ध नि स (अव.) स नि ध प म ग रि

## क्रम.

३७. सात स्वरांचें क्रमानें फक्त आरोहण करणें ह्यास **क्रम** असें ह्मणतात. प्रत्येक मूर्छनेंत ७ क्रम संभवतात. एकंदर क्रम ५६ × ७ = ३९२ गणिले आहेत.

## तान.

३८. एकपासून सहापर्यंत स्वरांचें क्रमानें आरोहण व अवरोहण करणें ह्यास **तान** असें ह्मणतात.

३९. तान दोन प्रकारची आहे:—१. **शुद्ध तान** व २. **कूट तान**.

४०. स्वरांचा व्युत्क्रम न करितां ह्मणजे स्वरांच्या क्रमांत बदल न करितां तयार केलेली तान ती **शुद्ध तान** होय, ह्मणजे शुद्ध मूर्छना घेऊन तीच सहा, पांच किंवा त्याहून कमी स्वरांची केली ह्मणजे शुद्ध तान होते.

## षाडव औडव व संपूर्ण.

४१. सहा स्वरांच्या तानेस **षाडव** व पांच स्वरांच्या तानेस **औडव** अशी सं-

ज्ञा आहे. षाड्व ताना २८ व औडव ताना २१ मिळून ४९ शुद्ध ताना होतात.

४२. स्वरांच्या क्रमांत बदल करून तयार केलेली तान ती **कूट तान** होय. एकपासून सात स्वरांपर्यंत कूटताना संभवतात. सात स्वरांच्या तानेस **संपूर्ण तान** असें म्हणतात.

४३. एक स्वराची तान १, दोन स्वरांच्या २, तीन स्वरांच्या ६, चार स्वरांच्या २४, पांच स्वरांच्या १२०, सहा स्वरांच्या ७२०, व सात स्वरांच्या ५०४०, अशा ताना संभवतात. एकूण ५९१३ कूटताना होतात. इतक्या ताना प्रत्येक मूर्छनेंत संभवतात.

४४. मूर्छना, क्रम व तान ह्यांचा उपयोग स्वरांचा प्रस्तार करण्यामध्यें फार होतो. कूटतानांची जी संख्या आहे तीच क्रमानें एकपासून सात स्वरांच्या प्रस्ताराचीही संख्या होते.

## वर्ण.

४५. ऱ्हस्व, दीर्घ, हळू, मोठ्यानें, जलद, सावकाश, कंपानें व हेलकाव्यानें वगैरे निरनिराळ्या प्रकारांनीं स्वरांची जी गाण्याची क्रिया तीस **वर्ण** असें ह्मणतात.

४६. वर्ण चार प्रकारचे आहेतः—१. **स्थायी**, २. **आरोही**, ३. **अवरोही**, व ४. **संचारी**.

४७. थांबून थांबून एकाच स्वराचा उच्चार केला ह्मणजे तो **स्थायी वर्ण** होतो. जसें—स स स, रि रि रि, ग ग ग इ०.

४८. गाण्यांत स्वरांचा फक्त आरोह केला ह्मणजे तो **आरोही वर्ण** होतो. जसें—स रि ग, म प ध इ०.

४९. स्वरांचा फक्त अवरोह करून गायन केलें ह्मणजे तो **अवरोही वर्ण** होतो. जसें— सं नि ध, प म ग इ०.

५०. ह्या तिन्ही प्रकारांचें यथासंभव मिश्रण ज्यांत आहे तो **संचारी वर्ण** होय. जसें—स रि स रि ग, रि ग रि ग म, इ०; स ग म रि, रि म प ग, इ०.

## अलंकार.

५१. विशेष प्रकारच्या वर्णरचनेस **अलंकार** असें ह्मणतात. अशा रचनेच्या योगानें गीतांस व रागांस फार शोभा येते, ह्मणून ह्यास अलंकार असें नांव दिलें आहे.

५२. स्थायी वर्णाचे अलंकार ७, आरोहीचे १२, अवरोहीचे तेच १२ व संचारीचे २५, मिळून ५६ अलंकार आहेत. ह्याशिवाय गीतांस उपयोगी पडणारे व सप्ततालांस अनुकूल असे ७ अलंकार व रागांस उपयोगी पडणारे आणखी ५ अलंकार शास्त्रांत सांगितले आहेत. सर्व मिळून ६८ अलंकार आहेत. प्रत्येक मूर्छनेंत हे सर्व अलंकार संभवतात.

५३. १. प्रसन्नादि, २. प्रसन्नांत, ३. प्रसन्नाद्यंत, ४. प्रसन्नमध्य, ५. क्रमरेचित, ६. प्रस्तार व ७. प्रसाद हे ७ स्थायी वर्णाचे अलंकार होत.

५४. १. विस्तीर्ण, २. निष्कर्ष, ३. बिंदु, ४. अभ्युच्चय, ५. हसित, ६. प्रेंखित, ७. आक्षिप्त, ८. संधिप्रच्छादन, ९. उद्गीत, १०. उद्वाहित, ११. त्रिवर्ण, आणि १२. वेणि हे १२ आरोही वर्णाचे अलंकार होत.

५५. हेच १२ अलंकार अवरोही वर्णाचेही आहेत.

५६. १. मंद्रादि, २. मंद्रमध्य, ३. मंद्रांत, ४. प्रस्तार, ५. प्रसाद, ६. व्यावृत्त, ७. स्खलित, ८. परिवर्त, ९. आक्षेप, १०. बिंदु, ११. उद्वाहित, १२. ऊर्मि, १३. सम, १४. प्रेंख, १५. निष्कूजित, १६. श्येन, १७. क्रम, १८. उद्घटित, १९. रंजित, २०. संनिवृत्तप्रवृत्त, २१. वेणु, २२. ललितस्वर, २३. हुंकार, २४. ल्हादमान (ऱ्हादमान), व २५. अवलोकित, हे २५ संचारी वर्णाचे अलंकार होत. •

५७. १. इंद्रनील, २. महावज्र, ३. निर्दोष, ४. सीर, ५. कोकिल, ६. आवर्त व ७. सदानंद हे गीतोपयोगी व सप्ततालांस अनुकूळ असे ७ अलंकार आहेत.

५८. १. चक्राकार, २. जव, ३. शंख, ४. पद्माकार व ५. वारिद हे ५ रागांस उपयोगीं पडणारे अलंकार होत.

५९. आरोही, अवरोही व संचारी वर्णांचे अलंकार संगीतरत्नाकराच्या मताप्रमाणें दिले आहेत. सप्ततालांचे ७ अलंकार व रागोपयोगी ५ अलंकार हे संगीतपारिजातकाराच्या मताप्रमाणें दिले आहेत. अलंकारांविषयीं विशेष माहिती व मतांतर पहावयाचें असल्यास **संगीतबोध** पुस्तक पहिलें, भाग पहिला, व परिशिष्ट ह्यांत अलंकारांचें पूर्णपणें विवेचन केलें आहे तेथें तें पहावें.

६० मूर्छना, तान, वर्ण व अलंकार यांचा उपयोग रागांचा विस्तार करण्यांत व रागांचें स्वरूप उदात्त व मनोरंजक करण्यांत फार होतो.



# बालसंगीतबोध.

## पुस्तक पहिलें.

### पाठ १.

**षड्जग्राम—उत्तरमंद्रा मूर्छना.**

**राग—नटनारायण; ताल—त्रिपुट, चतुरस्र जाति,**

**मध्यलय, मात्रा ८. ( २. ४. २. ) ( १.२.; १.२.३.४.; १.२. )**

( आरोह ) स रि ग म् प ध नि सं ।

( अवरोह ) सं नि ध प म् ग रि स ॥

( आरोह ) स रि ग म् प ध नि सं ।
आ आ आ आ आ आ आ आ ।

( अवरोह ) सं नि ध प म् ग रि स ॥
आ आ आ आ आ आ आ आ ॥

---

### पाठ २.

**राग व ताल सदर.**

**द्रुतलय, मात्रा ४. ( १. २. १. )**

( आरोह ) स रि ग म् प ध नि सं ।

( अवरोह ) सं नि ध प म् ग रि स ॥

विलंबितलय, मात्रा १६. ( ४: ८. ४. )

( आरोह ) स रि ग म् प ध नि सं ।

( अवरोह ) सं नि ध प म् ग रि स ॥

---

## पाठ ३.

अलंकार—निष्कर्ष ( आरोही व अवरोही )

राग व ताल सदर.

द्रुतलय, मात्रा ४. मात्रा = २ अक्षरकाल.

( आरोह ) सस रिरि गग म्म् पप धध निनि संसं ।

( अवरोह ) संसं निनि धध पप म्म् गग रिरि सस ॥

---

## पाठ ४.

अलंकार—संधिप्रच्छादन ( आरोही व अवरोही )

एकताल—( एका ) चतुरस्र जाति,

मध्यलय, मात्रा ४. ( १. २. ३. ४. )

( आरोह ) स रि ग ऽ रि ग म् ऽ ग म् प ऽ

म् प ध ऽ प ध नि ऽ ध नि सं ऽ ।

( अवरोह ) सं नि ध ऽ नि ध प ऽ ध प म् ऽ

प म् ग ऽ म् ग रि ऽ ग रि स ऽ ॥

---

## पाठ ५.

### अलंकार—आक्षेप ( संचारी )

एकताल—( एका ) त्र्यस्रजाति,

मध्यलय, मात्रा ३, ( १. २. ३. )

( आरोह ) स रि ग रि ग म् ग म् प
म् प ध प ध नि ध नि सं ।

( अवरोह ) सं नि ध नि ध प ध प म्
प म् ग म् ग रि ग रि स ॥

---

## पाठ ६.

### अलंकार—उदात्त ( संचारी )

ताल—रूपक, चतुरस्र जाति,

मध्यलय, मात्रा ६. ( २. ४. ) ( १. २.; १. २. ३. ४. )

( आरोह ) स रि स रि ग ऽ रि ग रि ग म् ऽ
ग म् ग म् प ऽ म् प म् प ध ऽ
प ध प ध नि ऽ ध नि ध नि सं ऽ ।

( अवरोह ) सं नि सं नि ध ऽ नि ध नि ध प ऽ
ध प ध प म् ऽ प म् प म् ग ऽ
म् ग म् ग रि ऽ ग रि ग रि स ऽ ॥

---

## पाठ ७.

**अलंकार—अभ्युच्छ्रय** किंवा प्रस्तार. ( संचारी )

**प्रकार पहिला.**

**ताल—त्रिपुट, चतुरस्र जाति, म० ल०, मात्रा ८.**

( आरोह ) स ग रि म् ग प म् ध प नि ध सं।

( अवरोह ) सं ध नि प ध म् प ग म् रि ग स॥

( प्रकार दुसरा )

**ताल—त्रिपुट, च० जा०, वि० ल०, मात्रा १६.**

( आरोह ) स स ग ग रि रि म् म् ग ग प प
म् म् ध ध प प नि नि ध ध सं सं।

( अवरोह ) सं सं ध ध नि नि प प ध ध म् म्
प प ग ग म् म् रि रि ग ग स स॥

---

## पाठ ८.

**अलंकार—हसित** ( आरोही व अवरोही )

**ताल—त्रिपुट, च० जा०, म० ल०, मात्रा ८.**

( आरोह ) स स रि स रि ग स रि ग म् स रि ग म् प
स रि ग म् प ध स रि ग म् प ध नि
स रि ग म् प ध नि सं।

( अवरोह ) सं सं नि सं नि ध सं नि ध प सं नि ध प म्
सं नि ध प म् ग सं नि ध प म् ग रि
सं नि ध प म् ग रि स॥

---




## पाठ ९.

### अलंकार—सम ( संचारी )

### अष्टताल—चतुरस्र जाति, ( चौताल )

मध्यलय, मात्रा १२. ( ४.४.२.२. )

( १. २. ३. ४; १. २. ३. ४.; १. २.; १. २. )

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ( आरोह ) | स रि ग म् | म् ग रि स | स रि | ग म् |
| | = ○ | − ○ | − | − |
| | रि ग म् प | प म् ग रि | रि ग | म् प |
| | = ○ | − ○ | − | − |
| | ग म् प ध | ध प म् ग | ग म् | प ध |
| | = ○ | − ○ | − | − |
| | म् प ध नि | नि ध प म् | म् प | ध नि |
| | = ○ | − ○ | − | − |
| | प ध नि सं | सं नि ध प | प ध | नि सं । |
| | = ○ | − ○ | − | − |
| ( अवरोह ) | सं नि ध प | प ध नि सं | सं नि | ध प |
| | = ○ | − ○ | − | − |
| | नि ध प म् | म् प ध नि | नि ध | प म् |
| | = ○ | − ○ | − | − |
| | ध प म् ग | ग म् प ध | ध प | म् ग |
| | = ○ | − ○ | − | − |
| | प म् ग रि | रि ग म् प | प म् | ग रि |
| | = ○ | − ○ | − | − |
| | म् ग रि स | स रि ग म् | म् ग | रि स ॥ |
| | = ○ | − ○ | − | − |

---

# पाठ १०.

## अभंग. ( चार चरणी )

### राग–कल्याण; ताल–त्रिवट, चतुरस्र जाति,

**मध्यलय, मात्रा ८. मात्रा = २ अक्षरकाल.**

देवा आह्मी बाळ । आमचा संभाळ ॥
कीजे सर्व काळ । दीन-बंधू ॥ १ ॥
आह्मीं बळ-हीन । नाहीं आह्मां ज्ञान ॥
आमचें पालन । कीजे देवा ॥ २ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| ग ऽ रि ऽ | स नि रि ऽ | प ऽ ग ऽ | ग ऽ ऽ ऽ |
| दे ० वा ० | आ ० ह्मी ० | बा ० ० ० | ळ ० ० ० । |
| ० | — | = | — |
| ग ऽ म ऽ | प ऽ म ऽ | ग रि | स स ऽ ऽ |
| आ ० म ० | चा ० सां ० | भा ० ० ० | ळ ० ० ० ॥ |
| ० | — | = | — |
| ग ऽ ग ऽ | प म ध ऽ | नि ऽ सं ऽ | नि ऽ ध ऽ |
| की ० जे ० | स ० र्व ० | का ० ० ० | ळ ० ० ० । |
| ० | — | = | — |
| प ऽ म ऽ | ग ऽ रि ऽ | ग रि ग ऽ | रि ऽ स ऽ |
| दी ० ० ० | न ० ० ० | बं ० ० ० | धू ० ० ० ॥ १ ॥ |
| ० | — | = | — |
| आ ० ह्मीं ० | ब ० ळ ० | ही ० ० ० | न ० ० ० । |
| ० | — | = | — |
| ना ० हीं ० | आ ० ह्मां ० | ज्ञा ० ० ० | न ० ० ० ॥ |
| ० | — | = | — |
| आ ० म ० | चें ० पा ० | ल ० ० ० | न ० ० ० । |
| ० | — | = | — |
| की ० ० ० | जे ० ० ० | दे ० ० ० | वा ० ० ० ॥२॥ |
| ० | — | = | — |

## पाठ ११.

### अभंग ( चार चरणी )

**राग–माळकौंस, ताल–त्रिवट, च० जा०,**

**मध्यलय, मात्रा ८, मात्रा = २ अक्षरकाल.**

देवा आह्मी बाळ । आमचा सांभाळ ॥
कीजे सर्व काळ । दीन–बंधू ॥ १ ॥
आह्मीं बळ–हीन । नाहीं आह्मां ज्ञान ॥
आमचें पालन । कीजे देवा ॥ २ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| स ऽ स ऽ | नि॒ ध॒ नि॒ ऽ | स ऽ म॒ ग॒ | म॒ ऽ ऽ ऽ |
| दे ० वा ० | आ ० ह्मी ० | बा ० ० ० | ळ ० ० ० । |
| ग॒ ऽ म॒ ऽ | ध॒ ऽ नि॒ ऽ | ध॒ ऽ म॒ ऽ | ग॒ म॒ स ऽ |
| आ ० म ० | चा ० सां ० | भा ० ० ० | ळ ० ० ० ॥ |
| म॒ ऽ ग॒ ऽ | म॒ ऽ ध॒ ऽ | नि॒ ऽ सं ऽ | सं ऽ ऽ ऽ |
| की ० जे ० | स ० र्व ० | का ० ० ० | ळ ० ० ० । |
| नि॒ ध॒ नि॒ ऽ | ध॒ ऽ म॒ ऽ | म॒ ऽ ग॒ ऽ | ग॒ म॒ स ऽ |
| दी ० ० ० | न ० ० ० | बं ० ० ० | धू ० ० ० ॥ १ ॥ |
| आ ० ह्मीं ० | ब ० ळ ० | ही ० ० ० | न ० ० ० । |
| ना ० हीं ० | आ ० ह्मां ० | ज्ञा ० ० ० | न ० ० ० ॥ |
| आ ० म ० | चें ० पा ० | ल ० ० ० | न ० ० ० । |
| की ० ० ० | जे ० ० ० | दे ० ० ० | वा ० ० ० ॥ १ ॥ |

---

# पाठ १२.

## अभंग ( चार चरणी )

### राग–सोहनी; ताल–त्रिवट, च० जा०,

**मध्यलय, मात्रा ८. मात्रा = २ अक्षरकाल.**

आम्हांसी रक्षावें । आणि वाढवावें ॥
बुद्धि ज्ञान द्यावें । कृपावंता ॥ ३ ॥
आम्हां बाळांवर । ममता अपार ॥
देवा निरंतर । असो द्यावी ॥ ४ ॥

स ऽ ग ऽ  म ऽ ध् ऽ  नि सं ऽ नि  रिं ऽ सं सं
आ ० ह्मां ०  सी ० र ०  क्षा ० ० ०  वें ० ० ० ।

नि ऽ सं ऽ  नि ऽ ध् ऽ  नि ऽ नि ध्  म् ऽ ग ऽ
आ ० णि ०  वा ० ढ ०  वा ० ० ०  वें ० ० ० ॥

ध् ऽ नि ऽ  सं ऽ रिं ऽ  गं ऽ ऽ ऽ  मं ऽ गं ऽ
बु ० द्धि ०  ज्ञा ० न ०  द्या ० ० ०  वें ० ० ० ।

रिं ऽ सं ऽ  नि ऽ ध् ऽ  नि ऽ नि ध्  म् ऽ ग ऽ
० ० कृ ०  पा ० ० ०  वं ० ० ०  ता ० ० ० ॥३॥

आ ० ह्मां ०  बा ० ळां ०  व ० ० ०  र ० ० ० ।

म ० म ०  ता ० अ ०  पा ० ० ०  र ० ० ० ॥

दे ० वा ०  नि ० रं ०  त ० ० ०  र ० ० ० ।

० ० अ ०  सो ० ० ०  द्या ० ० ०  वी ० ० ० ॥४॥

# पाठ १३.

## पद.

### राग–भीमपलासी; ताल–त्रिवट, चतुरस्त्र जाति,

**मध्यलय, मात्रा ८; मात्रा = २ अक्षरकाल.**

थोर तुझे उपकार ॥ आई थोर तुझे उपकार ॥ ध्रु० ॥
वदत विनोदें, हासत सोडी ॥ कोण दुधाची धार ॥ आई० ॥ १ ॥
नीज न आली तर गीत ह्मणे ॥ प्रेम जिचें अनिवार ॥ आई० ॥ २ ॥
येई दुखणें तेव्हां मजला ॥ कोण करी उपचार ॥ आई० ॥ ३ ॥
कोण कडेवर घेउनि फिरवी ॥ चित्तीं लोभ अपार ॥ आई० ॥ ४ ॥
बाळक दुर्बळ होतों तेव्हां ॥ रक्षण केलें फार ॥ आई० ॥ ५ ॥
त्वांचि शिकविलें, वाढविलें त्वां ॥ आहे मजवर भार ॥ आई० ॥ ६ ॥
स्मरण तुझ्या या दृढ ममतेचें ॥ होतें वारंवार ॥ आई० ॥ ७ ॥
नित्य करावें साह्य तुला मीं ॥ हा माझा अधिकार ॥ आई० ॥ ८ ॥

प ऽ प प | प ध् प म् | म् ऽ ग् ग् | ग् म् प ऽ
थो ० र तु | झे ० उ प | का ० ० र | आ ० ई ०

म् ऽ प म् | ग् रि ग् रि | स स ऽ ऽ | ऽ ऽ ऽ स
थो ० र तु | झे ० उ प | का ० ० ० | ० ० ० र ॥

नि् ऽ नि् नि् | स ग् ग् म् | म् ऽ ग् ग् | ग् म् प ऽ
थो ० र तु | झे ० उ प | का ० ० र | आ ० ई ०

म् ऽ प म् | ग् रि ग् रि | स स ऽ ऽ | ऽ ऽ ऽ स
थो ० र तु | झे ० उ प | का ० ० ० | ० ० ० र ॥ध्रु०॥

म् म् ग् म् | प ऽ प ऽ | नि् ध् नि् सं | नि् ध् प ऽ
व द त वि | नो ० दें ० | हा ० स त | सो ० ० डी ॥

प ऽ प प | प ध् प म् | म् ग् ग् | ग् म् प ऽ
को ० ण दु | धा ० ची ० | धा ० ० र | आ ० ई ० ॥ १ ॥

नी ० ज न | आ ० ली ० | त र गी ० | त ह्म णे ० ||

प्रे ० म जि | चें ० अ नि | वा ० ० र | आ ० ई ० || २ ||

ये ० ई ० | दु ख णें ० | ते ० व्हां ० | म ज ला ० ||

को ० ण क | री ० उ प | चा ० ० र | आ ० ई ० || ३ ||

को ० ण क | डे ० व र | घे ० उ नि | फि र वी ० ||

चि ० त्तीं ० | लो ० भ अ | पा ० ० र | आ ० ई ० || ४ ||

बा ० ळ क | दु ० र्ब ळ | हो ० तों ० | ते ० व्हां ० ||

र ० क्ष ण | के ० लें ० | फा ० ० र | आ ० ई ० || ५ ||

त्वां ० चि शि | क वि लें ० | वा ० ढ वि | लें ० त्वां ० ||

आ ० हे ० | म ज व र | भा ० ० र | आ ० ई ० || ६ ||

स्म र ण तु | झ्या ० या ० | दृ ढ म म | ते ० चें ० ||

हो ० तें ० | वा ० रं ० | वा ० ० र | आ ० ई ० || ७ ||

नि ० त्य क | रा ० वें ० | मा ० ह्य तु | ला ० मीं ० ||

हा ० मा ० | झा ० अ धि | का ० ० र | आ ० ई ० || ८ ||

# पाठ १४.

## पद.

### राग–बिहाग; ताल–त्रिवट, चतुरस्र जाति,

**मध्यलय, मात्रा ८; मात्रा = २ अक्षरकाल.**

थोर तुझे उपकार ॥ आई थोर तुझे उपकार ॥ ध्रु० ॥
वदत विनोदें, हांसत सोडी ॥ कोण दुधाची धार ॥ आई० ॥ १ ॥
नीज न आली तर गीत ह्मणे ॥ प्रेम जिचें अनिवार ॥ आई० ॥ २ ॥
येई दुखणें नेव्हां मजला ॥ कोण करी उपचार ॥ आई० ॥ ३ ॥
कोण कडेवर घेउनि फिरवी ॥ चित्तीं लोभ अपार ॥ आई० ॥ ४ ॥
बाळक दुर्बळ होतों तेव्हां ॥ रक्षण केलें फार ॥ आई० ॥ ५ ॥
त्वांचि शिकविलें, वाढविलें त्वां ॥ आहे मजवर भार ॥ आई० ॥ ६ ॥
स्मरण तुझ्या ह्या दृढ ममतेचें ॥ होतें वारंवार ॥ आई० ॥ ७ ॥
नित्य करावें साह्य तुला मीं ॥ हा माझा अधिकार ॥ आई० ॥ ८ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| स ऽ ग ग | ग म् प म् | ग रि स स | स ऽ नि ऽ |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० र | आ ० ई ० |
| ० | — | = | — |
| स म् ग म् | प ऽ नि ध | नि सं ऽ सं | नि ध प प |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० र | आ ० ई ० |
| ० | — | = | — |
| ग म् रि ग | ग म् प म् | ग ऽ ऽ रि | स ऽ ऽ स |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० ० | ० ० ० र॥ध्रु०॥ |
| ० | — | = | — |
| ग म् ग म् | प ऽ नि ऽ | सं ऽ सं सं | सं ऽ सं ऽ |
| व द त वि | नो ० दें ० | हां ० स त | सो ० डी ० ॥ |
| ० | — | = | — |
| सं ऽ नि ध | प ऽ नि ध | नि ऽ ऽ सं | नि ध प प |
| को ० ण दु | धा ० ची ० | धा ० ० र | आ ० ई ० |
| ० | — | = | — |
| ग म् रि ग | ग म् प म् | ग ऽ ऽ रि | स ऽ ऽ स |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० ० | ० ० ० र ॥१॥ |
| ० | — | = | — |

| | | | |
|---|---|---|---|
| नी ० ज नं | आ ० ली ० | त र गी ० | त ह्म णे ० \|\| |
| प्रे ० म जि | वें ० अ नि | वा ० ० र | आ ० ई ० \|\|२\|\| |
| ये ० ई ० | दु ख णें ० | ते ० व्हां ० | म ज ला ० \|\| |
| को ० ण क | रीं ० उ प | चा ० ० र | आ ० ई ० \|\|३\|\| |
| कों ० ण क | डें ० व र | घे ० उ नि | फि र वी ० \|\| |
| त्रि ० त्तीं ० | लो ० भ अ | पा ० ० र | आ ० ई ० \|\|४\|\| |
| बा ० ळ क | दु ० र्ब ळ | हो ० तां ० | ते ० व्हां ० \|\| |
| र ० क्ष ण | कें ० लें ० | फा ० ० र | आ ० ई ० \|\|५\|\| |
| त्वां ० चि शि | क वि लें ० | वा ० ढ वि | लें ० त्वां ० \|\| |
| आ ० हे ० | म ज व र | भा ० ० र | आ ० ई ० \|\|६\|\| |
| स्म र ण तु | झ्या ० या ० | दृ ढ म म | ते ० चें ० \|\| |
| हो ० तें ० | वा ० रं ० | वा ० ० र | आ ० ई ० \|\|७\|\| |
| नि ० त्य क | रा ० वें ० | सा ० ह्य तु | ला ० मी ० \|\| |
| हा ० मा ० | आ ० अ र्चि | का ० ० र | आ ० ई ० \|\|८\|\| |

---

# पाठ १५.

## पद.

### राग–कालंगडा; ताल–त्रिवट, चतुरस्र जाति,

**मध्यलय, मात्रा ८; मात्रा = २ अक्षरकाल.**

थोर तुझे उपकार ॥ आई थोर तुझे उपकार ॥ ध्रु० ॥
वदत विनोदें हासत सोडी ॥ कोण दुधाची धार ॥ आई० ॥ १ ॥
नीज न आली तर गीत ह्मणे ॥ प्रेम जिचें अनिवार ॥ आई० ॥ २ ॥
येई दुखणें तेव्हां मजला ॥ कोण करी उपचार ॥ आई० ॥ ३ ॥
कोण कडेवर घेऊनि फिरवी ॥ चित्तीं लोभ अपार ॥ आई० ॥ ४ ॥
बाळक दुर्बळ होतो तेव्हां ॥ रक्षण केलें फार ॥ आई० ॥ ५ ॥
त्वांचि शिकविलें वाढविलें त्वां ॥ आहे मजवर भार ॥ आई० ॥ ६ ॥
स्मरण तुझ्या या दृढ ममतेचें ॥ होतें वारंवार ॥ आई० ॥ ७ ॥
नित्य करावें साह्य तुला मीं ॥ हा माझा अधिकार ॥ आई० ॥ ८ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| प प म् ग | म् ऽ प प | ध् ऽ ऽ ध् | ध् ऽ प ध् |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० र | आ ० ई ० |
| म् प म् ग | म् ऽ प प | ध् ऽ नि ध् | प म् प प |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० ० | ० ० ० र ॥ |
| ध् ऽ सं सं | नि ध् प ध् | नि ध् सं नि | ध् ऽ प म् |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० र | आ ० ई ० |
| ध् प म् ग | म् ऽ प प | नि ध् ऽ ऽ | म् प ऽ प |
| थो ० र तु | झे ० उ प | का ० ० ० | ० ० ० र ॥ ध्रु० ॥ |
| प ध् प ध् | नि ऽ सं ऽ | रिं ऽ सं रिं | सं नि सं ऽ |
| व द त वि | नो ० दें ० | हा ० स त | सो ० डी ० ॥ |
| ध् ऽ सं सं | नि ध् प ध् | नि ध् सं नि | ध् ऽ प म् |
| को ० ण दु | धा ० ची ० | धा ० ० र | आ ० ई ० ॥ १ ॥ |

नी ० ज न   आ ० ली ०   त र गी ०   त ह्म णे ० ॥

प्रे ० म जि   वें ० अ नि   वा ० ० र   आ ० ई ० ॥२॥

ये ० ई ०   दु ख णें ०   ते ० व्हां ०   म ज ला ० ॥

को ० ण क   री ० उ प   चा ० ० र   आ ० ई ० ॥३॥

को ० ण क   डे ० व र   बे ० उ नि   फि र वी ० ॥

चि ० त्तीं ०   लो ० भ अ   पा ० ० र   आ ० ई ० ॥४॥

बा ० ळ क   दु ० र्ब ळ   हो ० तों ०   तें ० व्हां ० ॥

र ० क्ष ण   के ० लें ०   फा ० ० र   आ ० ई ० ॥५॥

त्यां ० चि शि   क वि लें ०   वा ० ढ वि   लें ० त्वां ० ॥

आ ० हे ०   म ज व र   भा ० ० र   आ ० ई ० ॥६॥

स्म र ण तु   झ्या ० या ०   दृ ढ म म   ते ० चें ० ॥

हो ० तें ०   वा ० रं ०   वा ० ० र   आ ० ई ० ॥७॥

नि ० त्य क   रा ० वें ०   सा ० ह्य तु   ला ० मीं ० ॥

हा ० मा ०   झा ० अ भि   का ० ० र   आ ० ई ० ॥८॥

---

